२०१०१००७१५२३२२००१

नक्षलग्रस्त भागात कार्यरत असलेल्या नगरपरिषदेच्या कर्मचा-यांना प्रोत्साहन भत्ता लागू करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय, क्र.एमयुएन.१००७/७७९/नवि.१८,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक - ६ ऑक्टोबर, २०१०.

वाचा - शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-टिआरएफ-२०००/प्र.क्र.३/बारा, दिनांक - ६ ऑगस्ट, २००२.

प्रस्तावना :-

नक्षलग्रस्त क्षेत्रातील बिकट परिस्थितीत शासनाच्या योजनांची प्रभावी अंमलबजावणी करणा-या शासकिय अधिकारी / कर्मचारी यांना त्या भागात काम करताना येणा-या अडचणींचा विचार करुन तसेच नक्षलगस्त /संवेदनशील भागात (जिविताची) सुरक्षितता इत्यादी बाबी लक्षात घेवून काही प्रोत्साहनपर सवलती देण्यात आलेल्या आहेत. त्या अनुषंगाने नक्षलग्रस्त भागात कार्यरत असलेल्या नगरपरिषदेच्या कर्मचा-यांना प्रोत्साहन भत्ता लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

राज्यातील नक्षलग्रस्त भागात कार्यरत असलेल्या अधिका-यांना / कर्मचा-यांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएफ-२०००/ प्र.क्र.३/बारा, दिनांक - ६ ऑगस्ट, २००२ मधील तरतूदी प्रमाणे त्यांच्या मूळ वेतनाच्या १५ टक्के इतका प्रोत्साहन भत्ता अनुज्ञेय राहील.

प्रोत्साहन भत्ता लागू करतांना नगरपरिषदांची आस्थापना खर्चाची टक्केवारी शासनाने विहीत केलेल्या मर्यादेत असणे गरजेचे आहे.

सदर प्रोत्साहन भत्यापोटी शासनाकडून स्वतंत्र अनुदान नगरपरिषदांना देण्यात येणार नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( का. तु. सातकर )
शासनाचे उप सचिव

प्रति,
१) आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय,वरळी, मुंबई-४०० ०३०,
२) विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, नगरपालिका प्रशासन कोकण/नाशिक/अमरावती/ नागपूर/पुणे/ औरंगाबाद
३) सर्व जिल्हाधिकारी.
४) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१, मुंबई
५) महालेखापाल ( लेखा परिक्षा ), महाराष्ट्र-१, मुंबई
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८) सामान्य प्रशासन विभाग, का.१२, मंत्रालय, मुंबई ३२.
९) निवड नस्ती, नवि-१८,नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.

GR.18.220.20307.MARATHE.THRTHASHETRA.